HIV/AIDS बाधित बालकांना तीव्र कमी
वजनाच्या बालकांसाठी अनुज्ञेय असलेला
आहार देणे बाबत..

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय ,क्रमांक :एबावि २०११ / प्र.क्र. ५६ /का-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २६ एप्रिल , २०११

**वाचा :-** १) महिला व बाल विकास विभाग , शासन निर्णय क्र.एबावि-२००८/प्र.क्र.५९/का-५ .
दिनांक २४.८.२००९ .
२) ममता हेल्थ इंस्टिटयूट फॉर मदर अॅण्ड चाईल्ड ,नागपूर यांचे दिनांक ३.१२.२०१० चे पत्र
३) आयुक्त, महिला व बाल विकास विभाग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे
पत्र क्र मबावि/एबाविसेयो/का-२/१११३/१०.११, दिनांक १६.२.२०११

**शासन निर्णय :-** संदर्भांकित अनुक्रमांक (१) येथील दिनांक २४.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत ६ महिने ते ६ वर्ष वयोगटातील तीव्र कमी वजनाच्या बालकांना ८०० उष्मांक व २० ते २५ ग्रॅम प्रथिने असलेला आहार तसेच नवसंजीवन क्षेत्रातील तीव्र कमी वजनाच्या बालकांना ९५० उष्मांक आणि २३ ते २८ ग्रॅम प्रथिने असलेला आहार देण्यात येतो. त्याप्रमाणेच ६ महिने ते ६ वर्ष वयोगटातील HIV/AIDS बाधित बालकांना तीव्र कमी वजनाच्या बालकांसाठी अनुज्ञेय असलेला पुरक पोषण आहार देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची बालके ज्या अंगणवाडीच्या परिक्षेत्रात रहात असतील त्या परिक्षेत्रातील प्राथमिक आरोग्य केंद्राच्या वैद्यकीय अधिका-यांनी आवश्यक वैद्यकीय प्रमाणपत्र दिल्यानंतरच अंगणवाडी सेविकेव्दारे सदर बाधित बालकांना तीव्र कमी वजनाच्या बालकांना अनुज्ञेय असणारा आहार देण्यात यावा.

३. सदरची बालके अंगणवाडीमध्ये नियमितपणे उपस्थित रहात नसली तरी सुध्दा संबंधित बालकांच्या पालकांमार्फत त्यांना अंगणवाडी सेविकेव्दारे घरपोच आहार पुरविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(ज.कि.मगरे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय , महाराष्ट्र राज्य, पुणे
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (महिला व बाल विकास आयुक्तालय पुणे यांचे मार्फत)
उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण / ग्राम पंचायत), (महिला व बाल विकास आयुक्तालय , पुणे यांचे मार्फत)

मा.सचिव महिला व बाल विकास यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
उप सचिव (आस्थापना ) महिला व बाल विकास , मंत्रालय, मुंबई-३२
महिला व बाल विकास विभाग, कार्या-४.
निवड नस्ती (कार्यासन-५)